<u>सर्वोच्च प्राथम्य</u>

सन २०१६-२०१७ ची जिल्हा वार्षिक
<u>आदिवासी उपयोजना तयार करणे....</u>
मार्गदर्शक तत्वे व कालबध्द कार्यक्रम...

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
### शासन परिपत्रक क्रमांकः टिएसपी-२०१५/प्र.क्र.१७४/कार्यासन.६

मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १८ सप्टेंबर,२०१५

<u>वाचा -</u>

**१) नि.वि, शासन परिपत्रक क्र.डिएपी १०१५/प्र.क्र.१४८/का-१४८१, दि.१३.८.२०१५**

**<u>शासन परिपत्रक</u> -**

शासन निर्णय, दिनांक २१.९.१९९२ अन्वये आदिवासी उपयोजना तयार करण्याच्या व राबविण्याच्या कार्यपध्दतीमध्ये शासनाने १९९३-९४ पासून धोरणात्मक बदल केले असून, त्यानुसार राज्याची आदिवासी उपयोजना तयार करण्याची पूर्णत: जबाबदारी आदिवासी विकास विभागाकडे दिलेली आहे. यात अंशिक बदल करण्यात आले असून आता विभागाच्या दिनांक १६ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची जबाबदारी त्या त्या जिल्ह्यांचे जिल्हाधिकारी यांच्याकडे सोपविण्यात आली आहे. त्यानुसार २०१६-२०१७ च्या वार्षिक आदिवासी उपयोजनेतंर्गत जिल्हा वार्षिक योजना तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सुचना प्रसारित करण्यात येत आहेत.

२. आदिवासी उपयोजना ही वार्षिक योजनेचा एक भाग असून आदिवासी उपयोजना तयार करण्याचा कार्यक्रम हा वार्षिक योजनेच्या कार्यक्रमाशी पूरक आहे. सन २०१६-२०१७ च्या जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेचे प्रारुप आराखडे संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी जिल्हाधिकाऱ्यांशी चर्चा करुन तयार करावे व ते आदिवासी उपयोजना समिती/जिल्हा नियोजन समितीमध्ये मान्यतेसाठी सादर करावेत.

३. प्रकल्प अधिकाऱ्यांनी जिल्हयाचा आराखडा तयार करीत असताना खालील मार्गदर्शक तत्वांचे काटेकोरपणे पालन करावे :-

(अ) यासोबत जोडलेल्या तक्त्याप्रमाणे (परिशिष्ट-अ व परिशिष्ट ब) आदिवासी उपयोजना व आदिवासी उपयोजना बाहेरील क्षेत्र जिल्ह्यांसाठी (TSP + OTSP) करिता दर्शविलेल्या नियतव्ययाच्या आधीन राहून वार्षिक आराखडा तयार करण्यात यावा.

(आ) यासोबत जोडलेल्या परिशिष्ट "क" प्रमाणे क्षेत्रनिहाय (Sectorwise) प्राप्त नियतव्ययचे आवंटन/ वाटप विभिन्न विभागामध्ये करण्यात यावे.

**(इ) सन २०१६-१७ पासून परिशिष्ट "इ" प्रमाणे नमूद राज्यस्तरावरील योजना जिल्हा नियोजन समितीकडे सोपविण्याचा निर्णय घेतला असल्याने या योजनाकरिता पुरेसा नियतव्यय राखीव ठेवावा व यासाठी लक्षांक निश्चीत करण्याची दक्षता घ्यावी. तसेच परिशिष्ट "ई" प्रमाणे नमूद जिल्हास्तरावरील योजना राज्यस्तरावर वर्ग करण्यात येत असल्याने यासाठी या योजनांना जिल्हास्तरावर नियतव्यय प्रस्तावित करण्यात येऊ नये.**

(ई) शिक्षण, आरोग्य, जलसंधारणाची कामे, रस्तेविकास इत्यादि विकास क्षेत्रनिहाय निधीवाटप निश्चित करताना या क्षेत्रातील अपेक्षीत साध्य ,प्रस्तावित बदल इत्यादि अनुषंगीक बाबी विचारात घेऊन त्याच्या पुर्ततेसाठी आदिवासी उपायोजना व सर्वसाधारण क्षेत्र योजना याखाली जिल्हयास विविध योजनांतर्गत प्राप्त होऊ शकणारा निधीचे नियोजन एकत्रितपणे विचारात घेऊन करण्यात यावे . तसेच नाविन्यपूर्ण किंवा अन्य अबांधील स्वरूपातील निधीच्या माध्यमातून अस्तित्वात असलेल्या योजनांमधून न करता येणा-या कामांसाठी/योजनांसाठी सदरचा निधी गॅप फिलींग म्हणून वापरण्यात यावा. शक्यतो एकाच प्रकारच्या कामासाठी कोणत्याही परिस्थितीत दोन वेगवेगळया योजनांच्या माध्यमातून वेगवेगळयाने निधी उपलब्ध होणार नाही याची दक्षता जिल्हानियोजन समितीने घ्यावी. मात्र काही कामांसाठी केंद्र पुरस्कृत योजनांद्वारे निधी मिळत असल्यास त्यामधुन अशी कामे प्रस्तावित करून उर्वरित कामांसाठी राज्यशासनाकडून विविध स्रोताद्वारे जिल्हयास उपलब्ध होणाऱ्या निधीचे एककेंद्राभिमुखता (Convergence) पध्दतीने नियोजन करुन फलनिष्पत्ती दायक अंमलबजावणी आराखडा तयार करावा.

(उ) जिल्हा वार्षिक योजना या परिशिष्ट ब मध्ये दिलेल्या कमाल नियतव्ययाच्या मर्यादेतच असाव्यात. योजनेंतर्गत करावयाच्या कामांच्या याद्याही आराखड्यासोबत असणे बंधनकारक आहे.

**(ऊ) लहान गट, जिल्हा नियोजन समिती व राज्यस्तरीय बैठकीसाठी तयार करण्यात येणारा जिल्हा योजनेचा आराखडा कार्यान्वयीन यंत्रणांनी योजना माहिती प्रणालीमध्येच (MP SIMS) सादर करणे बंधनकारक राहील. याशिवाय नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात येणार नाही.**

(ए) आदिवासी उपयोजना क्षेत्रातील प्रकल्प घेण्यासाठी सर्व प्रकल्पाचे कार्यक्षेत्र पूर्णरित्या आदिवासी उपयोजनेमध्ये आहे किंवा कसे याबाबत जिल्हाधिकारी यांनी स्वत: खात्री करावी. आदिवासी उपयोजना क्षेत्राकरिता केलेली तरतूद आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनेमध्ये खर्च करता येणार नाही याची काळजी संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

(ऐ) संबंधित विभाग प्रमुखांनी कामे आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आहेत याबाबतचे प्रमाणपत्र प्रशासकीय मान्यतेच्यावेळी स्वत:च्या स्वाक्षरीने अंदाजपत्रकासोबत जोडावे व जिल्हाधिकारी यांनी प्रशासकीय मान्यता देताना असे प्रमाणपत्र असल्याशिवाय प्रशासकीय मान्यता देऊ नये.

(ओ) आदिवासी उपयोजना क्षेत्रासाठी उपलब्ध करुन दिलेला नियतव्यय बिगर आदिवासी क्षेत्रावर खर्च झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी विभागप्रमुख व जिल्हाधिकारी यांची राहिल व याबाबत विभागप्रमुख यांच्यावर कडक प्रशासकीय कारवाई करण्यात येईल.

(औ) विविध योजनांच्या संदर्भात प्रकल्प अधिकाऱ्यांनी त्यांच्या प्रकल्प क्षेत्रात दौरे करुन क्षेत्रीय पातळीवरील अंमलबजावणी अधिकाऱ्यांशी चर्चा करावी व त्यानुसार आदिवासी क्षेत्रातील नेमकी गरज लक्षात घ्यावी व नेमक्या कोणत्या योजना घेण्याची आवश्यकता आहे हे निश्चित करावे. असे करताना ज्या भागात सदर योजना राबवावयाची असेल त्या भागातील मोठ्या संख्येने लाभार्थ्यांना लाभ मिळेल अशा कामांना सर्वप्राथम्य द्यावे व त्यांची गरज भागविल्यानंतर त्यापेक्षा कमी लोकसंख्येला लाभदायी ठरणाऱ्या योजनांचा अग्रक्रम द्यावा.

<u>कामांची निवड</u> -

I) कामनिहाय नियोजन होण्यासाठी जिल्हा योजने अंतर्गत घेण्यात येणा-या सर्व कामांची यादी व त्यावरील खर्चाचा तपशील प्रस्तावा सोबत जोडावा. तसेच तो योजना प्रणालीमध्येही भरण्यात यावा. सामान्यत: कोणत्याही योजनेला त्या योजनेअंतर्गत घ्यावयाची कामे निश्चित असल्याशिवाय नियतव्यय ठेवण्यात येवू नये व याची सर्वांनी काटेकोरपणे अंमलबजावणी करावी. कामांच्या याद्यांशिवाय निधी अर्थसंकल्पीत करण्यात येणार नाही याची नोंद घ्यावी.

II) **जिल्हा वार्षिक योजनेतून घेण्यात येणारी कामे २ वर्षाच्या कालावधीत पूर्ण करणे आवश्यक आहे.** त्यादृष्टीने कामाचे नियोजन तसेच निधीची तरतूद करण्यात यावी. योजनेचा आराखडा तयार करताना चालू कामांच्या उर्वरीत खर्चाच्या तरतूदीबाबत प्राथम्याने विचार करण्यात यावा. अपूर्ण कामामध्ये ७५% व त्यापेक्षा अधिक पूर्ण ५०% ते ७४% पूर्ण व ५०% पेक्षा कमी पूर्ण असे वर्गीकरण करुन त्याक्रमाने कामे पूर्ण करण्याचे नियोजन करावे, जेणेकरुन वितरीत निधी अखर्चीत राहणार नाही.

III) **जिल्हा आराखड्यात प्रस्तावित केलेल्या नियतव्यय मर्यादेतून अपूर्ण कामे पूर्ण करण्यासाठी लागणारा निधी वजा करुन उर्वरीत नियतव्यय रकमेच्या दीड पट रकमेच्या मर्यादेतीलच नवीन कामे प्रस्तावित करण्यात यावीत**. नवीन कामे/बांधकामांचा समावेश योजनेत करण्यापूर्वी अशा कामांच्या प्राथमिकता (आवश्यक तेथे शासनाची मान्यता किंवा जागेची उपलब्धता इ.) पूर्ण झाले आहेत व प्रस्तावित नियतव्यय खर्च होईल हे निश्चित झाल्यानंतर ती कामे समाविष्ट करावीत.

IV) अपूर्ण कामे जास्त प्रमाणात असल्यास, त्याचा आढावा घेण्यात यावा. स्थानिक गरजेनुसार अशा कामांचा प्राथम्यक्रम ठरवून प्राथम्यानुसार त्याकामांना निधी देण्यात यावा. तसेच कमी प्राथम्याच्या कामाबाबत सुरक्षित मर्यादेपर्यंत खर्च करुन अशा कामांना पुनर्विनियोजनाने निधी देण्यात यावा. उर्वरीत कामे थांबविण्यात यावीत. तसेच ज्या कामांवर लाक्षणीक तरतूद केली असेल ती कामे रद्द करण्यात यावीत.

<u>केंद्र पुरस्कृत योजना</u> -

**सन २०१६-२०१७ या वर्षापासून विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीच्या सर्व योजना जिल्हास्तरावर वर्ग करण्यात येत आहेत.** यामुळे या योजनांकरीता आवश्यक नियतव्यय जिल्हा नियोजन समितीकडे प्रस्तावित करण्याची जबाबदारी त्या जिल्ह्यातील संबंधित सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प व जिल्हाधिकारी यांची राहील. शिष्यवृत्तीसारख्या योजनांना तरतूदी अर्थसंकल्पित न झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प व जिल्हाधिकारी यांची राहील.

जिल्हास्तरावर सोपविण्यात आलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांना आवश्यक केंद्र व राज्य हिस्साकरीता नियतव्यय प्रस्तावित करण्याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यांनी घ्यावी.

<u>नाविन्यपूर्ण योजना</u>-

या सदराखाली घेण्यात येणाऱ्या योजना या प्रशासन / विकास कामे या क्षेत्रातील प्रयोगिक स्वरुपाच्या (Pilot Projects) असाव्यात. कोणत्याही परिस्थितीत केंद्र अथवा राज्यस्तरावर सद्यस्थितीत अस्तित्वात असलेल्या कोणत्याही योजनांना नाविन्यपूर्ण योजनांमधून तरतूद उपलब्ध करुन देण्यात येवू नये. नाविन्यपूर्ण किंवा अन्य अबांधील स्वरूपातील निधीच्या माध्यमातून अस्तित्वात असलेल्या योजनांमधून न करता येणा-या कामांसाठी/योजनांसाठी सदरचा निधी गॅप फिलींग म्हणून वापरण्यात यावा.

**<u>आदिम जमाती/पारधी विकास योजना</u>-**

ज्या जिल्हयात आदिम जमातीच्या लोकांची वस्ती आहे, अशा जिल्हयात उदा. ठाणे,पालघर व रायगड जिल्हा (कातकरी), गडचिरोली जिल्हा (माडीया गोंड), यवतमाळ व नांदेड जिल्हा (कोलाम) या जिल्हयातील आदिवासी उपयोजना नियोजन समितीने या आदिम जमातीच्या जलद विकासाकरीता वैयक्तिक अथवा कौटुंबिक लाभाच्या योजनांची तसेच मुलभूत विकासाच्या योजनांची आखणी करुन त्याकरीता त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात अग्रक्रमाने आवश्यक नियतव्यय जिल्हा आदिवासी उपयोजनेत उपलब्ध करुन द्यावा. त्याचप्रमाणे आदिम जमातीकरिता केलेल्या तरतुदीची योजनावार माहिती एका परिशिष्टात स्वतंत्ररित्या जोडून आदिवासी उपयोजनेच्या आराखडयाबरोबर शासनाला सादर करावी.

पारधी जमातीच्या विकासाकरीता, त्यांची जिल्हयातील लोकसंख्या विचारात घेवून त्या प्रमाणात त्यांच्या विकासासाठी असलेल्या कार्यक्रमासाठी आवश्यक तरतूद प्राधान्याने आदिवासी उपयोजनेमध्ये समाविष्ठ करावी. पारधी जमातीकरिता केलेल्या तरतुदीची योजनावार माहिती एका परिशिष्टात स्वतंत्ररित्या जोडून आदिवासी उपयोजनेच्या आराखडयाबरोबर शासनाला सादर करावी.

४. २०१६-२०१७ च्या जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनासाठी जिल्हावार/ प्रकल्पनिहाय कमाल आर्थिक मर्यादा सोबतच्या **जोडपत्र-ब** मध्ये देण्यात आली आहे. **सन २०१६-२०१७ च्या राज्य योजनेचे आकारमान अजून निश्चित न झाल्यामूळे या आर्थिक मर्यादा तात्पूरत्या स्वरुपाच्या आहेत. तथापि जिल्हास्तरीय योजनांकरीता एकुण रुपये २९४६९० .०० लक्ष नियतव्यय तुर्त प्रस्तावित करण्यात येत आहे. त्यात कमी अधिक बदल होण्याची शक्यता आहे.** जिल्हा योजनांची जेव्हा राज्यस्तरावर चर्चा होईल त्यावेळी जिल्हा योजनांचा नियतव्यय अंतिम करण्यात येईल.

५. २०१६-२०१७ ची जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना ही शासनाने दिलेल्या नव्या मार्गदर्शक तत्वानुसार तयार करावयाची आहे. अंदाज समितीने त्यांच्या चौदाव्या अहवालातील शिफारशीला अनुलक्षून विधान सभा सदस्यांना त्यांच्या मतदारसंघातील कोणत्या कामासाठी किती तरतूद करण्यात

आली याची माहिती मिळावी या हेतूने **प्रत्येक योजनेसाठी प्रस्तावित केलेल्या एकूण नियतव्ययाची विगतवारी प्रकल्प क्षेत्रातंर्गत विकास गटनिहाय/तालुकानिहाय स्वतंत्रपणे दाखविण्यात यावी.**

६. जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना तयार करतांना **परिशिष्ट-क** मधील मार्गदर्शक तत्वे तसेच शासनाच्या नियोजन विभागाच्या दिनांक १३ ऑगस्ट २०१५ नुसार दिलेल्या सर्वसाधारण सूचना विचारात घ्याव्यात.

७. जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना या **परिशिष्ट-अ** मध्ये दिलेल्या कमाल नियतव्ययाच्या मर्यादेत असावी. ज्या जिल्हयामध्ये एकापेक्षा अधिक प्रकल्प कार्यालये आहेत त्यांचेसाठी प्रकल्पनिहाय वाटप **परिशिष्ट-ब** मध्ये देण्यात आलेले आहे.

८. जिल्हा वार्षिक योजनेत प्रस्तावित केलेल्या नियतव्ययाची विकासक्षेत्र/ उपक्षेत्र /योजना/ प्रकल्प निहाय, तालुकावार विगतवारी जिल्हा आदिवासी उपयोजना/जिल्हा नियोजन समितीच्या सदस्यांना बैठकीपूर्वी उपलब्ध करुन देण्यात यावी.

९. २०१६-२०१७ च्या जिल्हा वार्षिक योजनेस राज्यस्तरावर अंतिम स्वरुप देण्यासाठी प्रत्येक जिल्हयाची आवश्यक असलेली माहिती विहित प्रपत्रामध्ये प्राप्त व्हावी म्हणून **१ ते ५ विवरणपत्रे** विहित केलेली आहेत.

१०. आदिवासी उपयोजनेची आखणी व अंमलबजावणी प्रभावीपणे करण्यासाठी प्रत्येक जिल्हयासाठी खालील बाबींचा समावेश असलेली स्वयंस्पष्ठ टिप्पणी प्रस्तावांच्या छाननी दरम्यान अंमलबजावणी अधिका-याच्या मदतीने तयार करुन ठेवावी.

- (i) रस्त्यांची यादी तयार करावी. यामध्ये जी आदिवासी गावे राज्य मार्गास जोडलेली नाहीत अशा रस्त्यांचा समावेश असावा. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील फक्त माडा व मिनीमाडा मधील रस्त्यांची कामे घेता येतील.
- (ii) तसेच जी गांवे/वाड्या/पाडे/आश्रमशाळा/प्राथमिक आरोग्य केंद्र इत्यादीसाठी नवीन रस्त्यांची कामे प्रस्तावित करावीत.
- (iii) वैद्यकीय उपलब्ध सुविधा व अनुशेष असल्यास त्याची माहिती.
- (iv) विद्युतीकरण न झालेली गावे
- (v) ज्या आदिवासी क्षेत्रातील गावांचे विद्युतीकरण झालेले नाही अशा गावांचा समावेश करावा.
- (vi) सिंचन प्रकल्पांची माहीती-
  - (अ) प्रकल्पाचे नाव
  - (ब) प्रकल्प पूर्ण झाल्याचे वर्ष अंदाजित खर्च
  - (क) सुरु असलेल्या नवीन प्रकल्पाची प्रशासकीय मान्यतेनुसार किंमत व आतापर्यंतचा खर्च व अपेक्षित खर्च.
  - (ड) नव्याने सुरु करावयाचे लघुपाटबंधारे प्रकल्प
- (vii) पाणीपुरवठा योजनेबाबतची सविस्तर माहिती

(viii) आतापर्यंत आदिवासी उपयोजनेतून सदर जिल्हयामध्ये झालेला खर्च
(ix) अंमलबजावणी अधिका-यांच्या काही अडचणी / नवीन प्रस्ताव असल्यास त्याचा तपशिल
(x) शासकीय / अनुदानीत आश्रमशाळा / वसतीगृहे / शालेय शिक्षण विभागामार्फत चालविण्यात येणा-या शाळा इ. ची सांख्यिकी माहिती.
(xi) विशेष केंद्रीय सहाय्य आणि भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत राबविण्यात आलेल्या /येणा-या योजनांबाबतची सांख्यिकी माहिती.
(xii) सन २०१४-१५ चा खर्च व सन २०१५-१६ चा अपेक्षित खर्चाचा विहित नमुन्यात तपशील.

वरील मुद्दे उदाहरणादाखल आहेत. त्यामध्ये जिल्हातील आदिवासींच्या विकाससंबंधीत आणखी काही उपयुक्त माहितीचा समावेश करणे आवश्यकता वाटल्यास समावेश करण्यात यावा.

११. सर्व संबंधितांना असे सूचित करण्यात येते की, वर उल्लेखिलेल्या मार्गदर्शक सूचना लक्षात घेऊन जिल्हयांच्या योजनाबाबतचा आराखडा तयार करण्यात यावा. आदिवासी उपयोजनेचा आराखडा केंद्र शासनाकडे / योजना आयोगाकडे पाठवावयाचा असल्यामूळे याबाबत तातडीने कार्यवाही पूर्ण करावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत मागासवर्गीयांचे कल्याण या शिर्षाखाली जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेवर राहिल. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत इतर विकास शिर्षाची जिल्हा वार्षिक योजना तयार करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव यांच्यावर राहिल. कोणत्याही परिस्थितीत जिल्हा आदिवासी उपयोजना समिती / जिल्हानियोजन समितीने संमत केलेल्या **जिल्हा योजनेच्या प्रस्तावाच्या १० प्रती आदिवासी विकास विभागाकडे व नियोजन विभागाकडे दिनांक ३० नोव्हेंबर, २०१५ पर्यंत पाठवाव्यात. तसेच संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना सुध्दा त्याचवेळेस प्रती पाठविण्याची व्यवस्था करावी.**

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१८१७३८०३६७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2015.09.18 17:46:23 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
**शासनाचे उप सचिव**

**<u>सहपत्र :- जोडपत्र</u>**

**प्रति,**

१. सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समित्या.

प्रत सादर अग्रेषित.

२. मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई

३. मा.मुख्यमंत्र्याचे सचिव

४. मा.उप मुख्यमंत्र्याचे सचिव

५. मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव

६. मा.राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव

७. मा.सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

९. सर्व अपर मुख्य सचिव / सर्व प्रधान सचिव / सचिव मंत्रालयीन विभाग

१०. प्रधान सचिव (नियोजन विभाग) मंत्रालय,मुंबई.

११. सर्व मंत्रालयीन विभाग,मंत्रालय,मुंबई

१२. अपर आयुक्त व सदस्य सचिव,विदर्भ वैधानिक विकास मंडळ,बी-२३/ए,साउथ अंबाझरी मार्ग,अंध विद्यालयाजवळ,नागपूर

१३. सदस्य सचिव,मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय कंपाऊड, तळमजला,औरंगाबाद-४३१००१

१४. सदस्य सचिव,उर्वरित महाराष्ट्र वैद्यानिक विकास मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, १८,वा मजला, (पश्चिम बाजू) मंत्रालयासमोर,मुंबई-३२

१५. कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, नविन प्रशासकीय इमारत, १९ वा मजला, (पश्चिम बाजू), मुंबई

१६. सर्व विभागीय आयुक्त

१७. आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक

१८. सर्व अपर आयुक्त,आदिवासी विकास,

१९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (१५ प्रति)

२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद

२१. सर्व विशेष कार्यकारी अधिकारी, विभागीय आयुक्तांची कार्यालये

२२. सर्व जिल्हाधिकारी कार्यालये

२३. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी

२४. सर्व प्रशासकीय विभागाखालील विभागप्रमुख

२५. सर्व एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प

२६. मा.प्रधान सचिव (आ.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

२७. आदिवासी विकास विभागातील सर्व उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, आ.वि.वि, मंत्रालय,मुंबई.

२८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ,नाशिक

२९. आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे

३०. संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई.

३१. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

**आदिवासी उपयोजना सन २०१६-१७**

**नियतव्यय वाटप सूत्र**

**शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग/का.६, दिनांक ९ जानेवारी २००७ नुसार**

**आदिवासी उपयोजनेचा नियतव्यय जिल्हास्तर व राज्यस्तर या दोन भागात विभागला जातो.**

| | | |
|---|---|---|
| सन २०१६-१७ नियतव्यय वाटप रुपये ५१७०००.०० लाख | | |
| राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींना आदिवासी उपयोजनेंतर्गत ५% निधी थेट देण्याबाबतच्या निर्णयानुसार एकूण नियतव्ययाच्या ५% रू.२५८५०.०० लक्ष निधी वगळून उर्वरित रू.४९११५०.०० लक्ष नियतव्याचे वाटप खालीलप्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहे. | | |
| जिल्हास्तर | | राज्यस्तर |
| ६० % | | ४० % |
| रुपये २९४६९०.०० लाख | | रुपये १९६४६०.०० लाख |
| जिल्हास्तरीय नियतव्ययाचे वाटप खालीलप्रमाणे दोन भागात विभागला जातो. | | |
| टिएसपी | ओटिएसपी | |
| ८५% | १५% | |
| रुपये २५०४८६.५० लाख | रुपये. ४४२०३.५० लाख | |
| १००% आदिवासी लोकसंख्येवर आधारित | सर्व ३६ जिल्हयांना १०० टक्के आदिवासी लोकसंख्येच्या प्रमाणात नियतव्यय वाटप करणे. वरील सुत्रानुसार ओटिएसपी क्षेत्रासाठी जास्त नियतव्यय उपलब्ध होत असल्यास तो कमी करुन आदिवासी उपयोजना क्षेत्रातील जिल्हयांना वाटप करण्यात येतो. त्याप्रमाणे सन २०१६-२०१७ या वर्षाकरिता रु.२०००.०० लक्ष नियतव्यय ए.आ.वि.प्र, जव्हार, डहाणू, अहेरी, भांमरागड व गडचिरोली प्रकल्पांना अतिरिक्त उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. | |

परिशिष्ट-अ

जिल्हा वार्षिक योजना सन २०१६-२०१७ करिता जिल्हानिहाय आर्थिक कमाल मर्यादा (सिलींग)

(रुपये लाखात)

| अ.क्र. | जिल्ह्याचे नांव | टिएसपी + अे.टि.एस.पी नियतव्यय | माडा + मिनीमाडा नियतव्यय | ओ.टि.एस.पी नियतव्यय | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | मुंबई उपनगर | ०.०० | ०.०० | ६२५.४४ | ६२५.४४ |
| २ | मुंबई शहर | ०.०० | ०.०० | १५०.१० | १५०.१० |
| ३ | पालघर | ४४०३९.४० | ०.०० | ८३६.६४ | ४४८७६.०४ |
| ४ | ठाणे | ९१२२.७० | ४५७.०५ | २०६४.३६ | ११६४४.११ |
| ५ | रायगड | १२११.०४ | २०९५.८८ | २०९२.३७ | ५३९९.३० |
| ६ | रत्नागिरी | ०.०० | ०.०० | १२१.८७ | १२१.८७ |
| ७ | सिंधुदूर्ग | ०.०० | ०.०० | ४१.७३ | ४१.७३ |
| ८ | नाशिक | ३९६९०.५७ | १३००.२७ | ५४८१.२३ | ४६४७२.०७ |
| ९ | धुळे | १३५९०.४३ | ०.०० | २७८४.१० | १६३७४.५३ |
| १० | नंदूरबार | ४३४४७.०५ | ०.०० | ६०३.७८ | ४४०५०.८३ |
| ११ | जळगाव | २५३९.१४ | ०.०० | ४७४०.५३ | ७२७९.६८ |
| १२ | अहमदनगर | ४९३७.७७ | २६५.९१ | २३२९.५४ | ७५३३.२२ |
| १३ | पुणे | ४४२०.५० | ६८३.१२ | २१६३.३७ | ७२६६.९८ |
| १४ | सातारा | ०.०० | ०.०० | १७७.२७ | १७७.२७ |
| १५ | सांगली | ०.०० | ०.०० | १०९.६६ | १०९.६६ |
| १६ | सोलापूर | ०.०० | ०.०० | ४६४.१३ | ४६४.१३ |
| १७ | कोल्हापूर | ०.०० | ०.०० | १८०.६८ | १८०.६८ |
| उर्वरित महाराष्ट्र | | १६२९९८.५९ | ४८०२.२३ | २४९६६.८० | १९२७६७.६३ |
| १८ | बुलढाणा | ०.०० | १५२२.२५ | ८०३.०५ | २३२५.३० |
| १९ | अकोला | ०.०० | १३३०.०० | ६५०.२९ | १९८०.२९ |
| २० | वाशिम | ०.०० | ११६६.५३ | ५२०.७४ | १६८७.२७ |
| २१ | अमरावती | १०१४५.४२ | १५६१.०७ | १२२२.६७ | १२९२९.१६ |
| २२ | यवतमाळ | ११२१८.९६ | २७५७.९१ | २२९९.१५ | १६२७६.०२ |
| २३ | नागपूर | १९०१.३१ | १७८१.१७ | ३२५०.४२ | ६९३२.९१ |
| २४ | वर्धा | ०.०० | १०८१.२४ | ११६०.९५ | २२४२.१९ |
| २५ | भंडारा | ०.०० | ७०३.०९ | ६६३.३५ | १३६६.४३ |
| २६ | गोंदिया | ५९५१.०१ | ७५८.८३ | ८२०.६२ | ७५३०.४६ |
| २७ | चंद्रपूर | ९८६२.५१ | २१०१.८८ | १५१५.९४ | १३४८०.३४ |
| २८ | गडचिरोली | २२७०३.७५ | ०.०० | ३३४.२२ | २३०३७.९७ |
| विदर्भ | | ६१७८२.९७ | १४७६३.९८ | १३२४१.४० | ८९७८८.३५ |
| २९ | औरंगाबाद | ०.०० | ०.०० | ८५७.५६ | ८५७.५६ |
| ३० | जालना | ०.०० | ०.०० | २५२.८० | २५२.८० |
| ३१ | बीड | ०.०० | ०.०० | १९५.७३ | १९५.७३ |
| ३२ | परभणी | ०.०० | ०.०० | २४२.३४ | २४२.३४ |
| ३३ | हिंगोली | ०.०० | २४६८.६८ | ३४०.८८ | २८०९.५६ |
| ३४ | नांदेड | ३८९१.२५ | १७७८.८० | १५४६.५३ | ७२१६.५८ |
| ३५ | उस्मानाबाद | ०.०० | ०.०० | २१५.५७ | २१५.५७ |
| ३६ | लातूर | ०.०० | ०.०० | ३४३.८७ | ३४३.८७ |
| मराठवाडा | | ३८९१.२५ | ४२४७.४८ | ३९९५.२९ | १२१३४.०२ |
| एकूण राज्य | | २२८६७२.८१ | २३८१३.६९ | ४२२०३.५० | २९४६९०.०० |

परिशिष्ट-ब

जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना सन २०१६-२०१७ करीता प्रकल्पनिहाय आर्थिक कमाल मर्यादा (सिलींग)

(रुपये लाखात)

| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पाचे नाव | टिएसपी + अे.टि.एस.पी नियतव्यय | माडा +मिनीमाडा नियतव्यय | ओ.टि.एस.पी नियतव्यय | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | पालघर | डहाणू | २४९४०.२२ | ०.०० | ८३६.६४ | २५७७६.८६ |
| | | जव्हार | १९०९९.१८ | ०.०० | ०.०० | १९०९९.१८ |
| | एकूण पालघर | | ४४०३९.४० | ०.०० | ८३६.६४ | ४४८७६.०४ |
| २ | नाशिक | नाशिक | २२३०८.५४ | ९५५.४२ | ३०७७.५४ | २६३४१.५० |
| | | कळवण | १७३८२.०३ | ३४४.८५ | २४०३.६९ | २०१३०.५७ |
| | एकूण नाशिक | | ३९६९०.५७ | १३००.२७ | ५४८१.२३ | ४६४७२.०७ |
| ३ | नंदूरबार | नंदूरबार | २२६६८.२७ | ०.०० | ६०३.७८ | २३२७२.०५ |
| | | तळोदा | २०७७८.७८ | ०.०० | ०.०० | २०७७८.७८ |
| | एकूण नंदूरबार | | ४३४४७.०५ | ०.०० | ६०३.७८ | ४४०५०.८३ |
| ४ | चंद्रपूर | चंद्रपूर | ५५२८.६० | १३१३.२५ | ९४५.७० | ७७८७.५४ |
| | | चिमूर | ४३३३.९२ | ७८८.६४ | ५७०.२४ | ५६९२.८० |
| | एकूण चंद्रपूर | | ९८६२.५१ | २१०१.८८ | १५१५.९४ | १३४८०.३४ |
| ५ | गडचिरोली | अहेरी | ४९९८.२३ | ०.०० | ७.६८ | ५००५.९१ |
| | | भामरागड | ६६९८.४१ | ०.०० | ०.०० | ६६९८.४१ |
| | | गडचिरोली | ११००७.११ | ०.०० | ३२६.५४ | ११३३३.६५ |
| | एकूण गडचिरोली | | २२७०३.७५ | ०.०० | ३३४.२२ | २३०३७.९७ |
| ६ | यवतमाळ | पांढरकवडा | ९६७५.७२ | ७००.४२ | १२५०.९० | ११६२७.०४ |
| | | पुसद | १५४३.२४ | २०५७.४९ | १०४८.२५ | ४६४८.९८ |
| | एकूण यवतमाळ | | ११२१८.९६ | २७५७.९१ | २२९९.१५ | १६२७६.०२ |

**परिशिष्ट-क**

**(शासन परिपत्रक :- टिएसपी-२०१५/प्र.क्र.१७४/का.६, दिनांक १८ सप्टेंबर, २०१५ चे सहपत्र)**

सन २०१६-१७ आदिवासी उपयोजना प्रारुप आराखडा तयार करताना उपविकास क्षेत्रनिहाय नियतव्ययाच्या टक्केवारीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| **अ.क्र.** | **उप विकास क्षेत्र** | **राखून ठेवावयाचा नियतव्यय (टक्केवारी)** |
|---|---|---|
| १ | मागासवर्गीयांचे कल्याण( आ.वि.वि.) | किमान ४० % |
| २ | विद्युत विकास (पारंपारिक व अपारंपारिक ऊर्जाकरिता) | किमान ४% |
| ३ | रस्ते विकास | कमाल १०% |
| ४ | लघुपाटबंधारे- | |
| | लघुपाटबंधारे - ० ते १०० हेक्टर | किमान ३ % |
| | लघुपाटबंधारे - १००हेक्टर वरील | किमान ३% |
| ५ | पशुसंवर्धन/मत्स्यव्यवसाय | कमाल १ % |
| ६ | शिक्षण (तंत्रशिक्षण व औद्योगिक प्रशिक्षण संस्थासह) | किमान ६ % |
| ७ | ग्रामीण पाणी पुरवठा | किमान ३% |
| ८ | आरोग्य | किमान १५ % |
| ९ | पोषण | किमान ३% |
| १० | मृदसंधारण | कमाल ३% |
| ११ | वन व वन पर्यटन (आदिवासी क्षेत्राच्या प्रमाणात वाटप करावे) | ३% |
| १२ | कृषि व फलोत्पादन | ३% |
| १३ | उर्वरित सर्व विकास शिर्षे | १ % |
| १४ | नाविन्यपूर्ण योजना | २ % |

जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना २०१६-२०१७ विकासक्षेत्र/उपक्षेत्रनिहाय तरतूदीकरीता विचारात घ्यावयाचे मुद्दे व त्याविषयीची मार्गदर्शक तत्वे.

**१. ज्या** जिल्हयात एकापेक्षा जास्त एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प आहेत, तेथील जिल्हयाला देण्यात आलेल्या कमाल नियतव्ययामधून जो नियतव्यय प्रकल्पासाठी निश्‍चित करण्यात आलेला आहे, त्या नियतव्ययामध्ये त्या प्रकल्पाची आदिवासी उपयोजना बसवावयाची आहे. तसेच जिल्हयासाठी निश्‍चित करुन देण्यात आलेल्या कमाल नियतव्ययाच्या मर्यादेमध्ये जिल्हयाची आदिवासी उपयोजना बसवावयाची आहे.

**२. ज्या जिल्हयात** एकापेक्षा जास्त प्रकल्प क्षेत्रे आहेत तेथे सर्व प्रकल्पांची एकत्रित योजना तयार करुन ती जिल्हा आदिवासी उपयोजना नियोजन समितीकडे परिशिष्ट-अ मध्ये जिल्हयाला दिलेल्या कमाल मर्यादेच्या अधिन राहून मंजूरीकरीता सादर करावयाची आहे.

३. **योजना** तयार करताना ज्या योजनांना लेखाशिर्ष उपलब्ध आहे, अशा योजनांना प्राधान्याने नियतव्यय उपलब्ध करुन द्यावा. तसेच तरतूद करताना ज्या जिल्ह्यात सुरु असलेल्या योजनांसाठी नियतव्यय प्रस्तावित करण्यात यावा. ज्या योजना त्या जिल्ह्यांत सुरु नाहीत, अशा योजनांसाठी नियतव्यय प्रस्तावित करु नये.

४. **सन २०१६-१७** पासून परिशिष्ट "**इ**" प्रमाणे नमूद राज्यस्तरावरील योजना जिल्हा नियोजन समितीकडे सोपविण्याचा निर्णय घेतला असल्याने या योजनाकरिता पुरेसा नियतव्यय राखीव ठेवावा व यासाठी लक्षांक निश्चीत करण्याची दक्षता घ्यावी.तसेच परिशिष्ट "**ई**" प्रमाणे नमूद जिल्हास्तरावरील योजना राज्यस्तरावर वर्ग करण्यात येत असल्याने यासाठी योजना जिल्हानियतव्यय प्रस्तावित करण्यात येउ नये.

-नियतव्यय प्रस्तावित करताना योजनानिहाय, **लेखाशिर्षनिहाय व बाबनिहाय** (उदा.आश्रमशाळा समूह लेखाशिर्ष क्रमांक **२२२५१५८२** या योजनेमध्ये **०१**-वेतन, **०२**-मजूरी, **०३**-अतिकालीक भत्ता, **०६**-दुरध्वनी, वीज व पाणी शुल्क इत्यादी बाबी) दर्शविण्यात याव्यात. बाबनिहाय नियतव्यय दर्शविताना आवश्यकतेनुसार नियतव्यय दाखवावा. **तसेच** शिर्षनिहाय प्राप्त तरतुदीतून अपुर्ण/चालु कामांसाठी पुर्णपणे तरतुद करून उर्वरीत नियतव्याच्या दीडपट मर्यादेत नवीन कामे घेण्यात यावीत. सदर विभागणी शिर्षनिहाय शक्य नसल्यास योजनानिहाय करण्यात यावी.

५. **केंद्रशासन** पुरस्कृत जिल्हा स्तरावरील योजनांसाठी राज्य शासनाच्या हिश्श्याची तरतूद ***अर्थसंकल्पीत करण्याची दक्षता घ्यावी. केंद्रीय योजनांसाठी आवश्यक राज्य हिश्श्याकरिता नियतव्यय राखीव ठेवण्याची जबाबदारी जिल्हा नियोजन समितीची राहील.***

६. **आदिवासी** उपयोजना प्रारुप आराखडा तयार करताना तेथील स्थानिक गरजा लक्षात घेवून प्रारुप आराखडा तयार करण्यात यावा.तथापि,उर्जा क्षेत्रातील उच्च दाबाच्या पारेषण वाहिन्या टाकणे, राष्ट्रीय व राज्य महामार्ग इ. कार्यक्रमांसाठी जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजनेमध्ये तरतूदी करण्यात येऊ नयेत. तथापि, आदिवासी क्षेत्रातील अशा प्रकारच्या कामांना/योजनांना जिल्हयाच्या सर्वसाधारण योजनेमधून आवश्यक तेवढया तरतूदी उपलब्ध करुन घेण्याचे प्रयत्न करण्यात यावेत.

७. **ज्या** जिल्हयात आदिम जमातीच्या लोकांची वस्ती आहे, अशा जिल्हयात उदा. ठाणे,पालघर व रायगड जिल्हा (कातकरी), गडचिरोली जिल्हा (माडीया गोंड), यवतमाळ व नांदेड जिल्हा (कोलाम) या जिल्हयातील आदिवासी उपयोजना नियोजन समितीने या आदिम जमातीच्या जलद विकासाकरीता वैयक्तिक अथवा कौटुंबिक लाभाच्या योजनांची तसेच मुलभूत विकासाच्या योजनांची आखणी करुन त्याकरीता त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात अग्रक्रमाने आवश्यक नियतव्यय जिल्हा आदिवासी उपयोजनेत उपलब्ध करुन द्यावा. त्याचप्रमाणे आदिम जमातीकरिता केलेल्या तरतुदीची योजनावार माहिती एका परिशिष्टात स्वतंत्ररित्या जोडून आदिवासी उपयोजनेच्या आराखडयाबरोबर शासनाला सादर करावी.

८. <u>**पारधी** जमातीच्या विकासाकरीता, त्यांची जिल्हयातील लोकसंख्या विचारात घेवून त्या प्रमाणात त्यांच्या विकासासाठी असलेल्या कार्यक्रमासाठी आवश्यक तरतूद प्राधान्याने आदिवासी उपयोजनेमध्ये समाविष्ठ करावी. पारधी जमातीकरिता केलेल्या तरतुदीची योजनावार माहिती एका परिशिष्टात स्वतंत्ररित्या जोडून आदिवासी उपयोजनेच्या आराखडयाबरोबर शासनाला सादर करावी.</u>

९. **जिल्हा** आदिवासी उपयोजना तयार करतांना आदिवासी उपयोजना क्षेत्र (अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रासह) आणि माडा व मिनीमाडा क्षेत्र असलेले क्षेत्र वगळून उरलेल्या भागातील आदिवासीसाठी (ओटिएसपी) वैयक्तीक व कौटुंबिक लाभाच्या योजनेकरीता निश्चित अशी तरतूद संबंधित विकास क्षेत्राखाली स्वतंत्रपणे दाखविण्यात यावी. ज्या जिल्हयात आदिवासी उपयोजना क्षेत्र आणि माडा व मिनीमाडा क्षेत्र नसेल त्या जिल्हयामध्ये सुध्दा ओटिएसपी करीता आवश्यक तेवढया प्रमाणात तरतूदी कराव्यात.

१०. **आदिवासी** उपयोजनेमध्ये माडा आणि मिनीमाडा क्षेत्रासाठी मुलभूत सोयी उपलब्ध करुन देण्यासाठी नियतव्यय उपलब्ध करुन देण्यात येतो. तसेच ओटिएसपी ही संकल्पना आदिवासी उपयोजनेचाच एक भाग राहील. परंतू ओटिएसपी क्षेत्रातील खर्चाबाबतचे वेगळे अहवाल केंद्र शासनाला सादर करावे लागतात. म्हणून माडा व मिनीमाडा क्षेत्रातील मूलभूत सोयी व वैयक्तिक लाभाच्या योजनांसाठी उपलब्ध करुन दिलेला नियतव्यय हा ओटिएसपी या संकल्पनेत समाविष्ट करुन तसा दाखविण्यात यावा.

११. **जिल्हयाला** आदिवासी उपयोजनेखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीपैकी त्या जिल्हयातील दुर्गम भागांसाठी जास्तीत जास्त निधी उपलब्ध व्हावा, या हेतूने असे कळविण्यात येते की, सदर जिल्हयातील इतर सर्वसाधारण आदिवासी भागाला जो निधी देय होईल, त्या निधीपेक्षा जास्त टक्केवारीने अतिदुर्गम भागासाठी नियतव्यय देण्यात यावा.

उदा. नंदूरबार जिल्हयातील तळोदा प्रकल्प क्षेत्रात एकूण ४ तालुके असून त्यापैकी अक्कलकुवा व अक्राणी या दोन तालुक्यामध्ये अतिदुर्गम क्षेत्राचा समावेश आहे. म्हणून तळोदा प्रकल्पांतर्गत जर **१००** रुपये नियतव्यय द्यावयाचा असेल तर त्यापैकी **९०%** लोकसंख्या व क्षेत्राच्या प्रमाणात ४ तालुक्यांना देय होईल व उर्वरित **१०%** नियतव्यय हा उपरोक्त दोन अतिदुर्गम तालुक्याला लोकसंख्येच्या व क्षेत्राच्या प्रमाणात वाढवून देण्यात यावा. अशारितीने प्राप्त होणाऱ्या नियतव्ययामधून अतिदुर्गम क्षेत्रासाठी जोडरस्ते व इतर पायाभूत सुविधा देण्याकरिता आवश्यक ती तरतूद प्राथम्यक्रमाने करावी. तथापि, सदर नियतव्ययातून रस्ता दुरुस्ती (डांबरीकरण, खडीकरण, मजबूतीकरण, रुंदीकरण) या बाबीसाठी नियतव्यय उपलब्ध करुन देण्यात येऊ नये.

१२. <u>**नाविन्यपूर्ण योजनांच्या बाबतीत (New Schemes/New Items)**</u> मागासवर्गीय कल्याण विकास शिर्षाशी संबंधित योजनांना अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचेमार्फत आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची तांत्रिक व प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

तसेच इतर विभागाशी संबंधित योजनांना तांत्रिक व प्रशासकीय मान्यता संबंधित नियंत्रक अधिका-यांकडून घेण्यात यावी. नाविन्यपूर्ण (नवीन योजना) योजनेसाठी परिपूर्ण प्रस्तावास मान्यता घेऊन त्यास आदिवासी विकास विभागाची व संबंधित विभागाची मान्यता घेण्याची जबाबदारी सर्वस्वी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहिल. त्या योजनेस आदिवासी विकास विभागाची मान्यता मिळाल्यानंतर व सदर योजनेसाठी लेखाशिर्ष उपलब्ध झाल्यानंतरच या नवीन योजनेसाठी आदिवासी उपयोजनेमध्ये तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात येईल.

**१३. आदिवासी** उपयोजनेखालील जिल्हा योजनांसाठी नियतव्यय निश्चित करताना स्टेटपूल योजनांसाठी नियतव्यय विहीत करु नये. आदिवासी उपयोजनेतील **स्टेटपूल** योजनेखालील या योजनांसाठी राज्यस्तरावर स्वतंत्रपणे निधी देण्यात येईल.

आदिवासी उपयोजनेचे आकारमान निश्चित झाल्यानंतर आदिवासी उपयोजनेसाठी उपलब्ध झालेल्या नियतव्ययाचे वाटप प्रथम खालीलप्रमाणे करण्यात यावे.

(i) **रस्ते व पूल-**

(अ) आदिवासी क्षेत्रातील रस्त्यांच्या कामामध्ये फक्त लिंकरोड म्हणजे मुख्य रस्त्यापासून गाव जोडणाऱ्या रस्त्यांचा समावेश असावा. त्यामध्ये फक्त सी.डी. वर्क्स, लहान पूल, व लहान मोऱ्या यांचा समावेश असावा.आदिवासी लोकसंख्येच्या उतरत्या क्रमानुसारची गांवे घेण्यात यावीत.रस्ते जोडण्याच्या कार्यक्रमात बारमाही रस्ते कार्यक्रमाला प्रथम प्राधान्य देण्यात यावे. शिवाय, ज्या आश्रमशाळांना/प्राथमिक आरोग्य केंद्र/उपकेंद्रांना जोडरस्ते नाहीत तेथील कामांना अग्रक्रम द्यावा. जिल्हा रस्ते, रस्त्यांचे रुंदीकरण, स्टेट हायवे इ. साठी आदिवासी उपयोजनेतून निधी देण्यात येऊ नये.

(ब) आदिवासी उपयोजना क्षेत्रात मार्च-२०१५ पर्यंत जिल्हानिहाय अर्थसंकल्पीत झालेल्या रस्त्यांसंदर्भात व सन २०१६-२०१७ मध्ये करावयाच्या कामांचा प्राधान्यक्रम सुरुवातीस निश्चित करण्यात यावा. तसेच प्राधान्य क्रमानुसार नवीन कोणती कामे यादित घेण्यात यावयाची आहेत व त्यास लागणारा निधी याबाबत स्वतंत्र विवरणपत्र देण्यात यावे.

(क) रस्त्यांच्या कामांना प्रशासकीय मान्यता देताना त्या जिल्ह्यासाठी मंजूर केलेल्या नियतव्ययाच्या मर्यादेतच रस्त्यांच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात यावी. जेणेकरुन पुढील आर्थिक वर्षात तरतूदीअभावी देयके प्रलंबित राहणार नाहीत.

**(ii) शिक्षण** –

उपक्षेत्रात अनुसुचित जमातीच्या मुलींना शाळेत नियमित येण्यासाठी उपस्थिती भत्ता व मागासवर्गीयांचे कल्याण (आ.वि.वि.) अनुसुचित जमातीच्या विद्यार्थीनींची गळती थांबविण्यासाठी प्रोत्साहन भत्ता अशा दोन समान योजना राबविण्यात येत आहेत. त्यापैकी आदिवासी विकास विभागाची योजना अधिक लाभदायक असल्यामुळे शिक्षण विभागाच्या योजनांसाठी नियतव्यय ठेवण्यात येऊ नये.

(iii). **शासनाचे महिला विषयक** नवीन धोरण लक्षात घेऊन त्यांचे करीता असलेल्या सर्व योजनांकरीता आवश्यक तरतूद ठेवण्यात यावी.

**१५. आदिवासी** उपयोजनेमधून १) आमदारांचा स्थानिक विकास कार्यक्रम २) डोंगरी विकास कार्यक्रम व ३) रोजगार हमी योजनेकरिता जिल्हानिहाय तरतूदी ठेवण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे या कार्यक्रमासाठी नियतव्यय देण्यात येऊ नये. यासाठीचा नियतव्यय सर्वसाधारण योजनेतून उपलब्ध करुन घ्यावा.

**१६. "मागासवर्गीयांचे कल्याण"** या विकासशिर्षाखाली किमान ४०% नियतव्यय राखून ठेवावयाचा आहे. त्यामधून मागासवर्गीयांचे कल्याण अंतर्गत येणाऱ्या योजनांसाठी किती नियतव्यय प्रस्तावित करण्यात यावा, याविषयी आयुक्त, आदिवासी विकास यांच्याकडून स्वतंत्र मार्गदर्शक सूचना प्रसृत केल्या जातील. त्यानुसार चालू आश्रमशाळा, शासकीय वसतिगृहे यांचे परिरक्षण तसेच तेलपंप व वीजपंप इ. योजनांकरिता आवश्यक तेवढा निधी उपलब्ध करुन देण्यात यावा.

**१७. जिल्हयाला** टिएसपी क्षेत्रासाठी व माडा, मिनी माडासाठी जो नियतव्यय उपलब्ध करुन देण्यात आला आहे, त्यामधून त्या क्षेत्रात राहणाऱ्या आदिवासींच्या वैयक्तिक व कौटुंबिक लाभाच्या योजनांकरिता २०% प्रमाणे व त्या क्षेत्रातील पायाभूत सुविधा निर्माण करण्याकरिता योजनांवर ८०% या प्रमाणे शासनाच्या धोरणानुसार खर्च करावयाचा आहे. म्हणून त्या दृष्टीने आवश्यक तेवढा निधी उपलब्ध करुन देण्याची दक्षता घेण्यात यावी. याशिवाय जिल्हयातील ओटिएसपीसाठी ठरवून देण्यात आलेल्या नियतव्ययातून आदिवासींच्या फक्त वैयक्तिक अथवा कौटुंबिक लाभाच्या योजनांकरिता फलदायी व निवडक योजनांसाठी नियतव्यय दिला जाईल, याची दक्षता घेण्यात यावी.

**१८. सर्व अंमलबजावणी** अधिकाऱ्यांनी नियोजन समितीने मान्य केलेल्या योजनांवरील प्रत्यक्ष खर्चावर आधारित मासिक खर्चाचे विवरणपत्र संबंधित विभाग प्रमुख/प्रशासकीय विभागामार्फत आदिवासी विकास विभागास सादर करावे.

**१९. जिल्हयातील** संवेदनशील तालुक्यांसाठी त्या त्या जिल्हयांकरिता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या नियतव्ययापैकी २०% नियतव्यय बाजूला काढून तो संवेदनशीनल तालुक्यांमध्ये समप्रमाणात अतिरिक्त नियतव्यय म्हणून वाटून देण्यात यावा.

-----------------

## परिशिष्ट-ड

**सन २०१६-२०१७ ची जिल्हा आदिवासी वार्षिक योजना तयार करण्याचे वेळापत्रक खालीलप्रमाणे आहे.**

| अ.क्र. | कार्यवाही पूर्ण करावयाचा दिनांक | कार्यवाहीचा टप्पा पूर्ण करणे |
|---|---|---|
| १ | २५/०९/२०१५ | अंमलबजावणी अधिकारी आदिवासी जिल्हा योजनांचे प्रस्ताव पाठविणे व त्याची MP-SIMS मध्ये नोंदणी करणे. |
| २ | ०५/१०/२०१५ | प्राप्त झालेल्या प्रस्तावांचे / योजनांचे जिल्हा नियोजन अधिका-यांनी एकत्रिकरण करुन जिल्हा आदिवासी योजनेचे प्रारुप तयार करणे. |
| ३ | १०/११/२०१५ | आदिवासी जिल्हा नियोजन समित्यांनी / सर्वसाधारण जिल्हा नियोजन समित्यांनी आदिवासी उपयोजनेच्या प्रारुपास मान्यता देणे व राज्यस्तरीय बैठकीत प्रारुप आराखडा ठेवण्यासाठी शिफारस करणे. |
| ४ | ३०/११/२०१५ | जिल्हाधिकारी कार्यालयाने आदिवासी विभागाकडे जिल्हा योजनांचा प्रारुप आराखडा पाठविणे. |
| ५ | १/१२/२०१५ ते ३१/१२/२०१५ | मा.मंत्री (आदिवासी) यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय बैठकीत जिल्हा नियोजन समितीच्या प्रतिनिधींबरोबर जिल्हानिहाय चर्चा करुन जिल्हा योजनेस अंतिम स्वरुप देणे. |

*******************

परिशिष्ट-इ

## राज्यस्तरावरून जिल्हास्तरावर ( जिल्हा नियोजन समितीकडे ) नव्याने वर्ग केलेल्या योजना

| अ.क्र. | **राज्य योजनेतुन जिल्हा योजनेकडे प्रस्तावित योजना** | लेखाशिर्ष |
|---|---|---|
| **अ** | **मुख्य लेखाशिर्ष २२२५ अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक कल्याण** | |
| १ | केंद्रवर्ती अर्थसंकल्प (न्युक्लिअस बजेट) | २२२५ १७०४ |
| २ | कन्यादान योजना. | २२२५ ३५०२ |
| ३ | भारत सरकार शिष्यवृत्ती | २२२५ C८९४ |
| | | २२२५ C९०२ |
| ४ | सुवर्ण महोत्सवी आदिवासी पूर्व माध्यमिक शिष्यवृत्ती योजना | २२२५ D७५२ |
| ५ | वैद्यकिय व तत्सम महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती | २२२५ ३५२९ |
| ६ | अनुसचित जमातीच्या लाभार्थ्यांना दुधाळ जनावरांचा (दोन गायी) पुरवठा करणे | २२२५ ३७३४ |
| ७ | आश्रमशाळांमध्ये क्रिडा स्पर्धांचे आयोजन करणे | २२२५ D७३४ |
| ८ | नक्षलवाद्यांना गावबंदी केलेल्या गावांना प्रोत्साहन योजना | २२२५ ३४५८ |
| ९ | आदिवासींना स्वयंपाकासाठी एल.पी.जी गॅस कनेक्शन उपलब्ध करुन देणे. | २२२५ ३७४३ |
| १० | पारधी समाजाच्या विकासासाठी विविध योजना राबविणे | २२२५ D१२६ |
| **ब** | **मुख्य लेखाशिर्ष २४०३-पशुसंवर्धन** | |
| १ | आदिवासी लाभार्थ्यांना संकरीत दुभत्या गायी, म्हैशी यांचे वितरण | २४०३ B९२४ |
| २ | १०० मांसल कुक्कुटपक्षी पालनाद्वारे कुक्कुट व्यवसाय सुरु करणे | २४०३ B९३३ |
| ३ | अंशत: ठानबंद पध्दतीने संगोपन करण्यासाठी अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना शेळी गट वापट करणे | २४०३ B९५१ |
| **क** | **मुख्य लेखाशिर्ष २४०६-वनीकरण व वन्य जीवन** | |
| १ | संरक्षित वनाच्या लगतचे क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांना स्वयंपाकी गॅस व सौरकुकर यांचे वाटप | २४०६ ८१८६ |
| २ | मध्यवर्ती रोपमळे व बी-बीयाणे तयार करण्यासाठी रोपमळे तयार करणे | २४०६ ८६४२ |
| ३ | सर्वसाधारण उपयोगाची झाडे लावणे | ४४०६ ३७६९ |

| | | |
|---|---|---|
| **ड** | **मुख्य लेखाशिर्ष २८०१-वीज** | |
| १ | महाराष्ट्र राज्य विज वितरण कंपनी मर्यादित यांना अनुदान | २८०१ ५०८९ |
| २ | महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणास सहाय्यक अनुदान | २८०१ ००५२ |
| **इ** | **मुख्य लेखाशिर्ष २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य** | |
| १ | राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना | २२१० इ४९१ |
| २ | राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान-राज्य आरोग्य संस्थांना सहाय्यक अनुदान | २२१० इ४५५ |
| **ई** | **मुख्य लेखाशिर्ष २७०२ लहान पाटबंधारे** | |
| १ | स्थानिक क्षेत्रातील लघुपाटबंधा-यांची कामे (० ते १०० हेक्टर) | २७०२ ८७६९ |
| **उ** | **मुख्य लेखाशिर्ष ४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च** | |
| १ | मृदसंधारण उपयोजनांमार्फत जमिनीचा विकास (पडकई) | ४४०२ २४०२ |
| २ | मृदसंधारण उपयोजनांमार्फत जमिनीचा विकास | ४४०२ २४८५ |
| ३ | मृदसंधारण उपयोजनांमार्फत जमिनीचा विकास | ४४०२ २४९४ |

*******************

## परिशिष्ट-ई

## जिल्हास्तरावरून राज्यस्तरावर नव्याने वर्ग केलेल्या योजना

| अ.क्र. | जिल्हा योजनेतुन राज्य योजनेकडे प्रस्तावित योजना | लेखाशिर्ष |
|---|---|---|
| **अ** | **मुख्य लेखाशिर्ष ४२२५ अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक कल्याण यावरील भांडवली खर्च** | |
| १ | वसतिगृह बांधणे | ४२२५ ००९६ |
| २ | वसतिगृह बांधणे (OTSP) | ४२२५ ०२३८ |
| ३ | आश्रमशाळा इमारत बांधणे | ४२२५ ०१२२ |
| ४ | आश्रमशाळा इमारत बांधणे (OTSP) | ४२२५ ०२०२ |
| **ब** | **मुख्य लेखाशिर्ष २२१७ नगरविकास** | |
| १ | विकास योजना कार्यान्वित करण्यासाठी नगरपालिकांना वित्तीय सहाय्य | २२१७ ०२८१ |
| **क** | **मुख्य लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्य जिवन** | |
| १ | पर्यटनासाठी वनांचा विकास करणे | २४०६ ६९४२ |
| **क** | **मुख्य लेखाशिर्ष २७०२- लहान पाटबंधारे व ४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च-जलसंपदा विभाग** | |
| १ | इतर लहान पाटबंधा-यांचे (राज्यक्षेत्र) सर्वेक्षणाची कामे | २७०२ ३६८७ |
| २ | स्वेच्छाधीन अनुदान (विस्तार व सुधारणा) | २७०२ ३६९६ |
| ३ | तापी पाटबंधारे विकास महामंडाळास भाग भांडवली अंशदान | ४७०२ ४९७२ |
| ४ | कोकण पाटबंधारे विकास महामंडाळास भाग भांडवली अंशदान | ४७०२ ४९८१ |
| ५ | गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडाळास भाग भांडवली अंशदान | ४७०२ ५०१२ |
| **ड** | **मुख्य लेखाशिर्ष २७०२- लहान पाटबंधारे व ४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च-जलसंधारण विभाग** | |
| १ | लहानपाटबंधा-यांची कामे-कोल्हापुर पध्दतीचे बंधारे (१०१ ते २५० हेक्टर) | ४७०२ ३६७१ |
| २ | उपसा जलसिंचन योजनेखाली आदिवासींना १०० टक्के अनुदान | ४७०२ ५२८२ |
| ३ | राज्य एकत्रित निधी अंतर्गत लहान पाटबंधारे योजना | ४७०२ ५२९१ |
| ४ | लघुपाटबंधारे कामांचे अन्वेषण व सर्वेक्षण (कोल्हापुर पध्दतीच्या बंधा-यासह) | २७०२ १५५९ |

विवरणपत्र - १

**प्रारुप वार्षिक आदिवासी उपयोजना सन २०१६-१७ च्या प्रस्तावित नियतव्ययाचा गोषवारा.**

**जिल्हा :-**

**(रुपये लाखात)**

| **अ.क्र.** | **क्षेत्र/उपक्षेत्र** | **अंमलबजावणी अधिकारी** | **सन २०१४-१५** | | **सन २०१५-१६** | | **सन २०१६-१७** | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | **मंजूर नियत व्यय** | **मार्च, २०१५ अखेरचा खर्च** | **मंजूर नियतव्यय** | **अपेक्षित खर्च** | **अंमलबजावणी अधिकाऱ्यांनी प्रस्तावित केलेला नियतव्यय** | **कमाल आर्थिक मर्यादेनुसार प्रस्तावित केलेला नियतव्यय** | **त्यापैकी भांडवली खर्च** |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** | **१०** |
| १ | पीक संवर्धन | | | | | | | | |
| २ | फलोत्पादन | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | |
| **एकूण** | | | | | | | | | |

**टिप** :- १) वरील स्तंभ २ मध्ये विकास क्षेत्रांची एकूण ३९ उपक्षेत्रे घ्यावीत.

२) सन २०१५-१६ चा मंजूर नियतव्यय आदिवासी विकास विभागाने काढलेल्या जिल्हा वार्षिक योजनेच्या पुस्तकात दर्शविल्याप्रमाणेअसावा.

३) स्तंभ ९ ची एकूण बेरीज जोडपत्र-१ मध्ये जिल्ह्यास दिलेल्या सिलिंग इतकी असावी.

**विवरणपत्र-२**

**प्रारुप वार्षिक आदिवासी उपयोजना सन २०१६-१७ च्या विकास क्षेत्रामधील योजना/प्रकल्प यासाठी प्रस्तावित नियतव्यय आणि भौतिक उद्दिष्टे**

| अ.क्र. पुस्तिकेतील क्र. योजना क्र. | विकासक्षेत्र / उपक्षेत्र/ योजनेचे/ प्रकल्पाचे नांव | प्रशासकीय विभाग व अंमलबजावणी अधिकारी | सन २०१५-१६ | | सन २०१६-१७ | | | भौतिक उद्दिष्टे/साध्य | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | मंजूर नियत व्यय | अपेक्षित खर्च (रु.लाखात) | अंमलब- जावणी अधिका- ऱ्यांनी प्रस्तावित केलेला नियतव्यय | कमाल आर्थिक मर्यादे- नुसार प्रस्तावित केलेला नियतव्यय | त्यापैकी भांडवली खर्च | बाब | परिमाण | २०१५-१६ | | २०१६-१७ |
| | | | | | | | | | | उद्दिष्टे | साध्य | प्रस्तावित उद्दिष्टे |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |
| | | | | | | | | | | | | |
| एकूण | | | | | | | | | | | | |

**टिप** :- १) स्तंभ २ मध्ये योजना घेताना त्या सन २०१५-१६ चे आदिवासी विकास विभागाने काढलेल्या पुस्तकातील क्रमानुसार घ्याव्यात. स्तंभ १ मध्ये अनु.क्र. नंतर या पुस्तकातील योजनेचा क्रमांक नमूद करावा. नवीन योजना सुचविल्या असल्यास त्या अशा योजना नंतर दाखवाव्यात. त्यांना पुस्तिकेतील क्रमांक देण्यात येणार नाहीत.

२) स्तंभ ४ ची एकूण २०१५-१६ च्या आदिवासी विकास विभागाने काढलेल्या पुस्तिकेत दर्शविल्याप्रमाणे नियतव्ययाची आकडेवारी असावी.

३) स्तंभ ७ ची एकूण जिल्ह्याला दिलेल्या सिलिंग इतकी असावी.

## विवरणपत्र-३

## जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारित येणाऱ्या बाह्य सहाय्यित प्रकल्पांसाठी लागणारा नियतव्यय

(रुपये लाखात)

| अ.क्र. | बाह्य सहाय्यित प्रकल्पाचे नांव | प्रकल्पाची मुदत | प्रकल्पाची एकूण अंदाजित किंमत (अलीकडील सुधारित) | एकूण मंजूर विदेशी अर्थसहाय्य | २०१४-१५ पर्यंत झालेला एकूण खर्च | २०१५-१६ मध्ये अपेक्षित खर्च | प्रकल्पाची उर्वरित अंदाजित किंमत (४-६+७) | सन २०१६-१७ साठी प्रस्तावित नियतव्यय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |

## विवरणपत्र-४

## जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारित येणाऱ्या केंद्र शासन पुरस्कृत योजनांसाठी लागणारा नियतव्यय

(रुपये लाखात)

| अ.क्र. | योजनेचे नांव व केंद्र व राज्य यांच्यामध्ये खर्चाच्या हिश्श्याचे प्रमाण | सन २०१४-१५ मध्ये झालेला खर्च | | | सन २०१५-१६ मधील मंजूर नियतव्यय | | | सन २०१६-१७ साठी प्रस्तावित नियतव्यय | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | एकूण |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| | | | | | | | | | | |
| | एकूण | | | | | | | | | |

**टिप** :- १) स्तंभ २ मध्ये जिल्हा योजनेतील सर्व उपक्षेत्रातील योजना घ्याव्यात.

२) राज्य हिस्सा म्हणजे जिल्ह्याच्या योजनेतील २०१५-१६ बाबत मंजूर नियतव्यय व २०१६-१७ साठी प्रस्तावित नियतव्यय दर्शवावा.

३) केंद्र हिस्सा नियतव्यय योजनेच्या खर्चाच्या प्रमाणानुसार दर्शवावा. सन २०१४-१५ केंद्र हिश्श्याचा प्रत्यक्ष खर्च दर्शवावा.

## विवरणपत्र-५

## विदर्भ, मराठवाडा व कोकण या विभागांच्या जलद विकासासाठी कालबध्द कार्यक्रमांसाठी प्रस्तावित केलेला नियतव्यय

(रुपये लाखात)

| अ.क्र. | कार्यक्रमाचे नांव | २०१४-१५ | | २०१५-१६ | | २०१६-१७ |
|---|---|---|---|---|---|---|
| | | नियतव्यय | खर्च | नियतव्यय | खर्च | प्रस्तावित नियतव्यय |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |